जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी आणि विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक या पदांच्या मानधनात वाढ करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग

(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)

शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१५/प्र.क्र.७५/आव्यप्र-१,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ७ /९/२०२१.

**वाचा** :- महसूल व वन विभाग शा.नि. क्रमांक :- आव्यप्र-२०१५/प्र.क्र.७५/आव्यप्र-१, दिनांक २४.६.२०१५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमासाठी निर्माण केलेल्या जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी / विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक या ४२ पदांना देण्यात येत असलेल्या रु. ३०,०००/- या मानधनांत सन २०१५ पासून वाढ झालेली नसल्याने या पदांना दरमहा रु. ४५,०००/- प्रमाणे मानधन देण्यास आणि त्यासाठी दरवर्षी होणा-या रु. ७५.६० लक्ष एवढया अतिरिक्त खर्चास राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या दिनांक ९.७.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी / विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक या ४२ पदांना दरमहा रु. ४५,०००/- प्रमाणे मानधन देण्याबाबतचे तसेच यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष क्रमांक २२४५ १७६१ खाली दरवर्षी करण्यासंदर्भात आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमासाठी निर्माण केलेल्या जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी / विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक या ४२ पदांना दरमहा रु. ४५,०००/- (रुपये पंचेचाळीस हजार फक्त) एवढे ठोक मानधन दिनांक १.९.२०२१ पासून अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर आदेश मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या दिनांक ९.७.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१) (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्ज करणे (२२४५ १७६१) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षातर्गंत दरवर्षी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२१०९०८११४१२६८८१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रती :-

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई
५) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवडनस्ती.